**संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई कार्यालयासाठी निर्लेखित वाहनाच्या बदल्यात नवीन वाहन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. औसुवआ-०५२१/प्र.क्र.८३/कामगार-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०२ जून, २०२३.

**वाचा** :- १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.एफडीई-०३/२०१०/ प्र.क्र.११/कामगार-१, दि. ८ फेब्रुवारी, २०११.
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.आरओव्ही ०९१२/ प्र.क्र.२६९/प्रशा-४, दि. २८ फेब्रुवारी, २०१३.
३) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांचा कार्यालयीन आदेश क्र.१२५, दि.०९.०८.२०१९
४) प्रभारी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.औसुवआ/आस्थापना/सं.प्र.२०२२-२३ /११६१२/१, दिनांक २२.११.२०२२

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय या आस्थापनेचे बळकटीकरण करणे या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये उद्योग उर्जा व कामगार विभागाने राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने वाहन आढावा घेतलेला असून औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयास एकूण १४ वाहने अनुज्ञेय ठरविण्यात आलेली आहेत. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई कार्यालयासाठी सन २०१२ साली मॉडेल-टाटा इंडिगो, क्र.एमएच०१ झेडए-०३५० हे वाहन खरेदी करण्यात आले होते. सदर वाहन संदर्भ क्र.३ च्या आदेशान्वये निर्लेखित करण्यात आले असून ई-लिलाव पद्धतीने विकून प्राप्त झालेली रक्कम शासकीय कोषागारात जमा करण्यात आली आहे. सदर वाहनाच्या बदल्यात नवीन वाहन खरेदीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय या आस्थापनेचे बळकटीकरण करणे या योजने अंतर्गत, संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई या कार्यालयाच्या वापरातील, क्र.एमएच०१ झेडए-०३५० (मॉडेल-टाटा इंडिगो/पेट्रोल) कार्यालयीन आदेश क्र.१२५, दि.०९/०८/२०१९ अन्वये निर्लेखित करण्यात आलेले आहे या निर्लेखित वाहनाच्या बदल्यात, गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लस (GeM) पोर्टलवर उपलब्ध, हे नवीन वाहन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या करिता होणारा खर्च, सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता, "मागणी क्र.के-४, २२३०-कामगार व सेवायोजन (००)(१६) औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाचे बळकटीकरण

आणि सुरक्षाविषयक बाबींची प्रभावी अंमलबजावणी (२२३०५७९३) ५१-मोटार वाहने", या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर वाहन (कार) खरेदी, ₹१०.००लक्ष किंमत मर्यादेत [वाहनाची किंमत+वस्तू व सेवा कर+टेम्परारी रजिस्ट्रेशन चार्जेस+सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करून] निधी उपलब्धतेच्या अधीन राहून करण्यात यावी.

४. सदर वाहन (कार) खरेदी, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दि.२४.०८.२०१७ नुसार केंद्र शासनाने विकसित केलेल्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (Gem) पोर्टलवरून करण्यात यावी. तसेच, शासनाने वेळोवेळी जाहीर केलेल्या वाहन खरेदीविषयक विहित कार्यपद्धतीस अनुसरून करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२३/२०२३/विनियम, दि.२१.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार आणि अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, यांच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०६०२१७५४१७७४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KARANSING PREMSING PATIL

Digitally signed by KARANSING PREMSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, pseudonym=3A3CA4E4F15E12F04BF0F70BCA1F3C39DEE206CB, serialNumber=C7FEED7178D6C14666A5DF36811F1763590E65B6F836A87E63789DC234173D66, cn=KARANSING PREMSING PATIL
Date: 2023.06.02 17:55:42 +05'30'

**( क. प्रे. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय कामगार भवन, ५ वा मजला, प्लॉट नं.सी-२०, ब्लॉक नं.ई, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रे (पू.) मुंबई-४०० ०५१.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
४) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) वित्त विभाग, कार्यासन (व्यय-१६/अर्थसंकल्प-३/विनियम), मंत्रालय, मुंबई.
६) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती.